202006081654151419

महाराष्ट्र शासन

महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

क्रमांक: डी एम यु/२०२०/प्र. क्र.९२/डी एम-१, दिनांक १९ मे, २०२०.

आदेश

**राज्यांमधील कोविड-१९ चे परिरोधन (प्रतिबंध) करण्यासाठी टाळेबंदीच्या वाढवलेल्या कालावधीमधील सुधारित मार्गदर्शक तत्त्वे.**

---

संदर्भ:

१) महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग आदेश क्रमांक. डीएमयु /सीआर ९२/ डीएमयु -१, दिनांक २ मे २०२०, ३ मे २०२०, ५ मे २०२०, ११ मे २०२०, १५ मे २०२० व १७ मे २०२०.

२) गृह मंत्रालय ( एमएचए) आदेश क्र. ४०-३/२०२०-डी एम-१(ए), दिनांक १ मे २०२०, ११ मे २०२० व १७ मे २०२०.

**ज्याअर्थी**, आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ याअन्वये प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून, खाली सही करणार, अध्यक्ष, राज्य कार्यकारी समिती यांनी, आपल्या अधिकारात, दिनांक ३१ मे, २०२० पर्यंत टाळेबंदी उपाययोजना वाढविण्यासाठी दिनांक १७ मे, २०२० चा आदेश काढला आहे आणि गृह मंत्रालय (एम एच ए), भारत सरकार यांनी, कोविड -१९ चा फैलाव होण्यास प्रतिबंध करण्यासाठी दिनांक ३१ मे, २०२० पर्यंत टाळेबंदी वाढवण्यासाठी सुधारित मार्गदर्शक तत्त्वे व आदेश काढलेले आहेत.

**त्याअर्थी** आता, आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ याअन्वये प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून, खाली सही करणार, अध्यक्ष, राज्य कार्यकारी समिती हे, आपल्या अधिकारात, याद्वारे, सुधारित मार्गदर्शक तत्त्वे निर्गमित करीत असून ती राज्यातील कोविड-१९ वैश्विक साथ रोगाचे परिरोधन (प्रतिबंध) करण्यासाठी टाळेबंदीच्या वरील वाढवलेल्या कालावधीसाठी म्हणजेच दिनांक ३१ मे, २०२० पर्यंत लागू असतील आणि महाराष्ट्र शासनाचे सर्व विभाग, यासोबत जोडलेल्या सुधारित मार्गदर्शक तत्त्वांची, दिनांक २२ मे, २०२० पासून काटेकोरपणे अंमलबजावणी करतील.

आणखी असाही निदेश देण्यात येत आहे की, आधीचे सर्व आदेश, या आदेशास संलग्न असतील आणि ३१ मे, २०२० पर्यंत व त्यासहीत अंमलात राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अजोय मेहता)
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:

१. माननीय महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे प्रधान सचिव, मुंबई.

२. माननीय सभापती, महाराष्ट्र विधान परिषद.

३. माननीय अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा.

४. माननीय मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

५. माननीय उपमुख्यमंत्री यांचे सचिव, महाराष्ट्र शासन.

६. माननीय विरोधी पक्षनेता, विधान परिषद /विधानसभा यांचे खाजगी सचिव.

७. सर्व माननीय मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय .

८. महाराष्ट्र शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव.

९. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

१०. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय.

११. सचिव, वैद्यकीय शिक्षण, मंत्रालय.

१२. राज्यातील सर्व विभागीय आयुक्त.

१३. राज्यातील सर्व पोलीस आयुक्त.

१४. राज्यातील सर्व महानगरपालिका आयुक्त.

१५. सर्व जिल्हाधिकारी.

१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.

१७. राज्यातील सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग,**

**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**

**क्रमांक: डीएमयु/२०२०/प्र.क्र.९२/डीएम-१, दिनांक १९ मे, २०२०.**

**विषय: राज्यामधील कोविड-१९ चे परिरोधन (प्रतिबंध) करण्यासाठी टाळेबंदी वाढविणे व हाती घ्यावयाच्या उपाययोजनांबाबत सुधारित मार्गदर्शक तत्त्वे.**

---

संदर्भ: दिनांक २२ मे, २०२० पासून दिनांक ३१ मे, २०२० पर्यंत टाळेबंदीच्या वाढवलेल्या कालावधीमध्ये राज्यामधील कोविड-१९ चे परिरोधन (प्रतिबंध) करण्यासाठी हाती घ्यावयाच्या उपाययोजनांबाबत नवीन सुधारित मार्गदर्शक तत्त्वे.

(गृह मंत्रालय (एम एच ए) आदेश क्रमांक४०-३/२०२०-डीएम--१(ए), दिनांक १७ मे, २०२०, महाराष्ट्र शासन, महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, अधिसूचना क्रमांक. डीएमयु/प्र. क्र.९२/ डीएमयु-१, दिनांक १७ मे, २०२० यानुसार)

१. डीएमयु /२०२०/प्र.क्र.९२/ डी एम -१, दिनांक १७ मे, २०२० यानुसार, टाळेबंदीचा कालावधी दिनांक ३१/०५/२०२० पर्यंत अंमलात राहील.

२. हा आदेश, २२/५/२०२० पासून अंमलात येईल आणि ३१/५/२०२० पर्यंत अंमलात राहील.

३. हा आदेश (जोडपत्रांसह), दिनांक २/५/२०२० च्या टाळेबंदी आदेशाच्या तरतुदी (आणि त्याच्या नंतरच्या सुधारणा /स्पष्टीकरणे), अधिक्रमित करील.

४. **राज्यभरामध्ये पुढील कार्ये, नियमितपणे <u>प्रतिबंधित</u> राहतील:**

**एक.** देशांतर्गत वैद्यकीय सेवा, देशांतर्गत हवाई रुग्णवाहिका आणि सुरक्षाविषयक प्रयोजने किंवा गृह मंत्रालयाने परवानगी दिलेली प्रयोजने यांव्यतिरिक्त सर्व देशांतर्गत व आंतरराष्ट्रीय विमान प्रवासी वाहतूक.

**दोन.** मेट्रो रेल्वे सेवा.

**तीन.** शाळा, महाविद्यालये, शैक्षणिक, प्रशिक्षण, शिकवणी वर्ग संस्था, इत्यादी बंद राहतील. ऑनलाइन/दूरस्थ अध्ययन चालू ठेवण्यास परवानगी असेल आणि त्यास प्रोत्साहन देण्यात येईल.

**चार.** पर्यटकांसह निवास्थानःअंतर्गत आरोग्य/पोलीस/शासकीय कर्मचारी/आरोग्य सेवा कामगार/अडकून पडलेल्या व्यक्ती यांसाठी व विलगीकरण सुविधांसाठी असेल आणि बस आगार, रेल्वे स्थानके, विमानतळ येथे उपहारगृह चालविणे, त्याखेरीज हॉटेल, उपाहारगृहे व इतर आतिथ्य सेवा. खाद्यमदार्थ घरपोच देण्यासाठी स्वयंपाक घरे ( किचन) चालविण्यासाठी उपाहारगृहांना परवानगी असेल.

पाच. सर्व चित्रपट गृहे, भव्य बाजार संकुले (शॉपिंग मॉल), व्यायाम शाळा, तरण तलाव, मनोरंजन उद्याने, नाट्यगृहे, बार व प्रेक्षागृहे, सभागृहे व तत्सम ठिकाणे.

सहा. सर्व सामाजिक/राजकीय/क्रीडा/मनोरंजन/शैक्षणिक/सांस्कृतिक/धार्मिक कार्यक्रम/इतर संमेलन/भव्य प्रार्थनासभा.

सात. सर्व धार्मिक स्थळे/प्रार्थनास्थळे जनतेसाठी बंद ठेवण्यात येतील. धार्मिक प्रार्थना सभांना सक्त मनाई असेल.

५. जोडपत्र – एक मध्ये नमूद केल्याप्रमाणे, व्यक्तींच्या वाहतुकीसाठी मानक कार्य प्रणाली (एस ओ पी) लागू असेल.

६. कोविड-१९ च्या व्यवस्थापनाचे राष्ट्रीय निदेश:
जोडपत्र दोन मध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे, कोविड-१९च्या व्यवस्थापनाच्या राष्ट्रीय निदेशांचे राज्यभर अनुपालन करण्यात येईल.

७. रात्रीची संचारबंदी:
अत्यावश्यक कामांसाठी असेल त्याखेरीज, संध्याकाळी ७ वाजल्यापासून सकाळी ७ वाजेपर्यंत व्यक्तींना संचार करण्यास सक्त मनाई असेल. स्थानिक प्राधिकरणे, फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम १४४ खालील मनाई आदेश यासारख्या कायद्याच्या यथोचित तरतुदींअन्वये अधिकारितेच्या संपूर्ण क्षेत्रांमध्ये आदेश काढतील, आणि त्यांच्या काटेकोर अनुपालनाची सुनिश्चिती करतील.

८. रोग प्रतिसादक्षम व्यक्तींचे संरक्षण:
अत्यावश्यक व वैद्यकीय सेवांखेरीज, ६५ वर्षे वयावरील व्यक्ती, व्याधिग्रस्त व्यक्ती, गर्भवती महिला व १० वर्षे वयाखालील बालके यांनी घरातच राहावे.

९. भारत सरकारने शिफारस केलेली प्रमाणके आणि आरोग्यविषयक विद्यमान पायाभूत सुविधा व इतर संबंधित बाबी विचारात घेतल्यानंतर, राज्याच्या क्षेत्राची पुढील प्रक्षेत्रांमध्ये (झोन) विभागणी केली आहे:

**रेड झोन :**
बृहन्मुंबई महानगरपालिकेसह मुंबई महानगर प्रदेशातील सर्व महानगरपालिका,
पुणे, सोलापूर, औरंगाबाद, मालेगाव, नाशिक, धुळे, जळगाव, अकोला व अमरावती महानगरपालिका.

**बिगर रेड झोन (ऑरेंज व ग्रीन झोन):**
राज्याचे उर्वरित क्षेत्र.

१०. परिरोधन (प्रतिबंधित) प्रक्षेत्र (**Containment Zone**):

एक. आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाच्या (एम ओ एच एफ डब्ल्यू) मार्गदर्शक सूचना विचारात घेतल्यानंतर, महानगरपालिका/जिल्हा प्राधिकरणांद्वारे रेड व बिगर रेड झोन मधील परिरोधन (प्रतिबंधित) प्रक्षेत्रे सीमांकित करण्यात येतील.

दोन. महानगरपालिका क्षेत्रांमध्ये महानगरपालिका आयुक्त व जिल्ह्याच्या इतर भागांमध्ये संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी यांना परिरोधन (प्रतिबंधित) प्रक्षेत्रे निश्चित करण्याचा अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. अशी प्रक्षेत्रे ही, उपलब्ध साधनसामग्री विचारात घेऊन प्रभावीपणे नियमन केले जाऊ शकेल व कार्यक्षमतेने चालविले जाऊ शकेल असे एक युनिट असावे. परिरोधन (प्रतिबंधित) प्रक्षेत्रे हे, निवासी वसाहत, मोहल्ला, झोपडपट्टी, इमारत, इमारतींचा समूह, गल्ली,प्रभाग, पोलीस ठाणे क्षेत्र, गाव, गावांचा छोटा समूह, इत्यादीपैकी काहीही असेल. मुख्य सचिवांशी विचारविनिमय केल्यानंतर, यापेक्षा मोठे क्षेत्र (उदाहरणार्थ. संपूर्ण तालुका /संपूर्ण महानगरपालिका, इत्यादी) परिरोधन (प्रतिबंधित) प्रक्षेत्र म्हणून घोषित करता येऊ शकेल.

तीन. प्रतिबंधित क्षेत्रांमध्ये केवळ अत्यावश्यक कामांना मुभा असेल. आकस्मिक वैद्यकीय निकड व अत्यावश्यक वस्तूंचा पुरवठा याखेरीज या प्रक्षेत्रांमध्ये व त्याबाहेर लोक येणे-जाणे करीत नाहीत याची सुनिश्चिती व्हावी म्हणून काटेकोरपणे नियंत्रण ठेवण्यात येईल. वरील प्रयोजनांसाठी आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालयाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेण्यात येतील.

११. बाधित प्रक्षेत्रांमध्ये (रेड झोन) पुढील कार्ये करण्यास परवानगी देण्यात येईल:

एक. या आदेशापूर्वी अत्यावश्यक वस्तूंची जी दुकाने उघडण्यास अनुमती व परवानगी देण्यात आली होती ती सर्व दुकाने नियमितपणे उघडता येतील.

दोन. या आदेशापूर्वी दिलेल्या शिथिलता व मार्गदर्शक सूचना यांनुसार आणि संबंधित महानगरपालिकेच्या धोरणानुसार चालू आहेत अशी सर्व बिगर अत्यावश्यक दुकाने नियमितपणे चालू ठेवण्यास मुभा देण्यात येईल. जर घरपोच सेवा किंवा अन्यथा परवानगी दिलेली असेल तर, दारूची दुकाने, नियमितपणे चालू राहतील.

तीन. रेड झोनमध्ये उघडण्याची परवानगी नसलेली दुकाने/भव्य बाजार संकुले (मॉल)/आस्थापना/उद्योग यांना सकाळी ९ ते संध्याकाळी ५ वाजेपर्यंत साहित्य/ संयंत्र व यंत्रसामग्री/ फर्निचर, इत्यादींची निगा राखण्याच्या व देखभाल करण्याच्या प्रयोजनार्थ आणि मालमत्ता व वस्तूंचे पावसाळापूर्व संरक्षण कामांसाठीच केवळ परवानगी देण्यात येईल. तथापि, इतर कोणत्याही कार्यांना (वाणिज्यिक/ उत्पादन, इत्यादी) परवानगी देण्यात येणार नाही.

चार. अत्यावश्यक तसेच बिगरअत्यावश्यक वस्तू व साहित्यासाठी ई-कॉमर्स कार्ये.

पाच. जे चालविण्यास परवानगी आहे असे सर्व औद्योगिक घटक.

सहा. ज्या उघडण्यास व चालविण्यास मुभा आहे अशा सर्व बांधकाम जागा (सरकारी/खाजगी). ज्यांना मुभा देण्यात आली आहे अशी सर्व पावसाळापूर्व कामे (सरकारी/खाजगी).

सात. जन वाहतुकीस पुढील रीतीने परवानगी असेल:

| | |
|---|---|
| टॅक्सी/ कॅब/ समूह वाहतूक (aggregator) | नाही |
| रिक्षा | नाही |
| चार चाकी वाहन | केवळ अत्यावश्यक १+२ |
| दुचाकी वाहन | केवळ अत्यावश्यक एक चालक |

आठ. आरोग्य व वैद्यकीय, कोषागार, आपत्ती व्यवस्थापन, पोलीस, एनआयसी, अन्न व नागरी पुरवठा, एफसीआय, एन.वाय. के., नगरपालिका सेवा यांसह सर्व आपत्कालीन कर्मचारीवर्ग गरजेनुसार त्या त्या स्तरावर कार्यान्वित केले जाऊ शकतात.

दुय्यम निबंधक व प्रादेशिक परिवहन कार्यालये आणि उप प्रादेशिक परिवहन कार्यालये यांसह इतर सर्व शासकीय कार्यालये (आयुक्तालये व संचालनालये यांसह), अध्यापनेतर प्रयोजनांसाठीची विद्यापीठांची /महाविद्यालयांची कार्यालये, उत्तरपत्रिकांचे मूल्यमापन करणे, निकाल घोषित करणे व ई-आशय विकास यात सहभागी असणारे कर्मचारी, ५% इतक्या संख्येने किंवा किमान १० कर्मचारी यांपैकी जे अधिक असतील तितक्या संख्येने काम करतील. केंद्र सरकारची कार्यालये परवानगी दिलेल्या विद्यमान मानकांनुसार काम करणे चालू ठेवतील.

नऊ. घरपोच सेवा देणारी उपाहारगृहे/स्वयंपाकगृहे.

दहा. या आदेशापूर्वी परवानगी व मुभा देण्यात आलेल्या सर्व कार्यांना नियमितपणे परवानगी असेल.तथापि, सर्व खाजगी कार्यालये बंद ठेवण्यात येतील.

**१२. आरोग्य सेतू उपयोजकाचा वापर:**

एक. आरोग्य सेतू उपयोजकामुळे संक्रमणाची संभाव्य जोखीम लवकर निश्चित करणे शक्य होते, आणि व्यक्ती व समूहासाठी एक ढाल म्हणून काम करतो.

दोन. कार्यालयांमध्ये व कामाच्या ठिकाणी सुरक्षिततेची सुनिश्चितता करण्यासाठी, अनुरूप भ्रमणध्वनी असणाऱ्या सर्व कर्मचाऱ्यांनी आरोग्य सेतू हे उपयोजक स्थापित केले आहे याची सुनिश्चिती करण्यासाठी नियुक्त्याने सर्वतोपरी प्रयत्न करावेत.

तीन. जिल्हा प्राधिकरणे, अनुरूप भ्रमणध्वनीवर आरोग्यसेतू उपयोजक स्थापित करण्याचा आणि उपयोजकावर त्यांची आरोग्य स्थिती नियमितपणे अद्ययावत करण्याचा व्यक्तींना सल्ला देतील. यामुळे जोखीम असणाऱ्या व्यक्तींना वेळीच वैद्यकीय सुविधा पुरवून लक्ष देणे सुलभ होईल.

**१३. विवक्षित प्रकरणी व्यक्तींची व वस्तूंची वाहतूक करण्याचे विशेष निर्देश:**

एक. सर्व प्राधिकरणे, कोणत्याही निर्बंधाशिवाय वैद्यकीय व्यावसायिक, परिचारिका व परा-वैद्यकीय कर्मचारीवर्ग, सफाई कर्मचारी व रुग्णवाहिका यांची आंतरराज्यीय व राज्यांतर्गत वाहतूक करण्यासाठी परवानगी देतील.

दोन. सर्व प्राधिकरणे, रिकाम्या ट्रक्ससह सर्व प्रकारचा माल/कार्गो यांच्या आंतरराज्य वाहतुकीस परवानगी देतील.

तीन . कोणतेही प्राधिकरण, शेजारील देशांशी असलेल्या करारान्वये भू-सीमापार कोणत्याही प्रकारची माल/कार्गो वाहतूक थांबवणार नाही.

१४. <u>बिगर रेड झोन (नॉन रेड झोन):</u>

या आदेशाच्या खंड ४ मध्ये नसलेल्या आणि ज्यांना स्पष्टपणे मनाई केलेली किंवा बंदी घातलेली नाही अशा सर्व कार्यांना पुढील शर्तींसह बिगर बाधित प्रक्षेत्रांमध्ये (नॉन रेड झोन) परवानगी देण्यात येईल:

अ. परवानगी असलेली कार्ये हाती घेण्यासाठी किंवा पार पाडण्यासाठी कोणत्याही शासकीय प्राधिकरणाकडून परवानगी घेण्याची आवश्यकता असणार नाही.

ब. क्रीडा संकुले व स्टेडियम आणि इतर सार्वजनिक खुल्या जागा वैयक्तिक व्यायाम करण्यासाठी उघडण्याची परवानगी देण्यात येईल, तथापि, तेथे प्रेक्षकांना व समूह कार्यक्रमांना परवानगी देण्यात येणार नाही. सर्व शारीरिक कसरत व इतर हालचाली, सामाजिक अंतराची (social distancing) मानके पाळून करण्यात येतील.

क. सर्व सार्वजनिक व खाजगी परिवहन व्यवस्थेमध्ये प्रवासी व्यवस्थापन पुढीलप्रमाणे करण्यात येईल:

| | | |
|---|---|---|
| एक. | दुचाकी | : एक चालक |
| दोन. | तीन चाकी | : १+२ |
| तीन. | चार चाकी | : १+२ |

ड. शारीरिक अंतर ठेवून आणि स्वच्छतेच्या उपाययोजना करून कमाल ५०% क्षमतेसह जिल्ह्यांतर्गत बससेवेस परवानगी देण्यात येईल.

इ. आंतरजिल्हा बस सेवेच्या बाबतीतील आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

फ. सर्व बाजार/दुकाने सकाळी ९ ते संध्याकाळी ५ वाजेपर्यंत खुली राहतील. जर कोणतीही गर्दी किंवा सामाजिक अंतराच्या मानकांचा भंग झाल्याचे दिसून आले तर, प्राधिकरणे, असे बाजार/दुकाने तात्काळ बंद करतील.

१५. सर्वसाधारण सूचना:

अ) या आदेशात काहीही अंतर्भूत असले तरी, परिरोधन ( प्रतिबंधित) प्रक्षेत्रे, या आदेशापूर्वी निर्धारित केलेल्या आरोग्य नियमांचे नियमितपणे अनुपालन करतील.

ब) मुख्य सचिव, महाराष्ट्र यांच्या मान्यतेशिवाय, कोणतेही जिल्हा /प्रादेशिक/ राज्य प्राधिकरण, या मार्गदर्शक तत्त्वांचे उल्लंघन करणारा किंवा त्याविरूध्द असा कोणताही आदेश/ मार्गदर्शक तत्त्व/निदेश देणार नाही.

क) यासोबत जोडलेले **जोडपत्र- तीन** हे सोयीसाठी असून ते मुख्य आदेशासह वाचले पाहिजे.

**१६. दंडनीय तरतुदी:**

या उपाययोजनांचे उल्लंघन करणारी कोणतीही व्यक्ती, भारतीय दंड संहितेच्या कलम १८८अन्वये कायदेशीर कारवाई करण्यास तसेच आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ ची कलमे ५१ ते ६० च्या तरतुदींनुसार, आणि लागू असतील अशा इतर कायदेशीर तरतुदी याअन्वये कार्यवाही करण्यास पात्र असतील. या दंडात्मक तरतुदींचे उतारे **जोडपत्र- चार** मध्ये दिलेले आहेत.

जोडपत्र - एक

[महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२, आदेश क्रमांक: डीएमयु/२०२०/प्र.क्र. ९२/डिएम-१,दिनांक १९ मे, २०२०]

## गृह मंत्रालयाने (एम एच ए) निर्गमित केलेली मानक कार्य प्रणाली

एक. दिनांक २ एप्रिल, २०२०च्या आदेशान्वये निर्गमित केलेली भारतातील परदेशी नागरिकासाठी (नागरिकांसाठी) प्रवास व्यवस्था मानक कार्य प्रणाली.

दोन. दिनांक १९ एप्रिल, २०२० च्या आदेशान्वये निर्गमित केलेली राज्यांतील/ केंद्रशासित प्रदेशांतील अडकून पडलेल्या मजुरांच्या स्थानांतरणाबाबतची मानक कार्य प्रणाली.

तीन. दिनांक २१ एप्रिल, २०२० च्या आदेशान्वये निर्गमित केलेली नोकरीवर असलेले व नोकरीवर नसलेले भारतीय खलाशी यांच्याबाबतची मानक कार्य प्रणाली.

चार. दिनांक २९ एप्रिल, २०२० च्या आदेशान्वये व दिनांक १ मे, २०२० च्या आदेशान्वये निर्गमित केलेली अडकून पडलेले स्थलांतरित कामगार, यात्रेकरू, पर्यटक, विद्यार्थी व इतर व्यक्ती यांच्या स्थानांतरणाबाबतची मानक कार्य प्रणाली .

पाच. दिनांक ५ मे, २०२० च्या आदेशान्वये निर्गमित केलेली, देशाबाहेर अडकून पडलेले भारतीय नागरिक आणि विदेशी प्रवासासाठी विनिर्दिष्ट व्यक्ती यांच्या स्थानांतरणाबाबतची मानक कार्य प्रणाली.

सहा. दिनांक ११ मे, २०२० च्या आदेशान्वये रेल्वेने प्रवास करणाऱ्या व्यक्तींच्या स्थानांतरणाबाबतची मानक कार्य प्रणाली.

जोडपत्र-दोन

[महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२ आदेश क्रमांक: डीएमयु/२०२०/प्र.क्र९२/डीएस एम-१ दिनांक १९ मे, २०२०]

## कोविड-१९ व्यवस्थापनाबाबतचे राष्ट्रीय निदेश

एक. सर्व सार्वजनिक व कामाच्या ठिकाणी चेहरा झाकणे अनिवार्य आहे.

दोन. सार्वजनिक व कामाच्या ठिकाणी थुंकणे हे, राज्य शासन/ स्थानिक प्राधिकरण यांचे कायदे, नियम, विनियम यांनुसार विहित करण्यात येईल अशा दंडाच्या शिक्षेस पात्र असेल.

तीन. सार्वजनिक ठिकाणी व वाहतुकीच्या दरम्यान सर्व व्यक्तींद्वारे सामाजिक अंतराचे पालन करण्यात येईल.

चार. विवाहासंबंधीच्या कार्यक्रमात सामाजिक अंतर राखण्याची सुनिश्चिती करण्यात येईल आणि या कार्यक्रमास परवानगी असलेल्या पाहुण्यांची कमाल संख्या ५० पेक्षा अधिक असणार नाही.

पाच. अंत्यसंस्कार/अंत्यविधी यासंबंधातील कार्यक्रमात सामाजिक अंतर राखण्याची सुनिश्चिती करण्यात येईल आणि या कार्यक्रमास परवानगी असलेल्या पाहुण्यांची कमाल संख्या ५० पेक्षा अधिक असणार नाही.

सहा. सार्वजनिक ठिकाणी मद्यपान,पान, तंबाखू, इत्यादींच्या सेवनास परवानगी असणार नाही.

सात. दुकानांमध्ये दोन ग्राहकांदरम्यान कमाल ६ फूट इतके अंतर राखण्याची सुनिश्चिती करण्यात येईल आणि दुकानात ५ पेक्षा अधिक व्यक्तींना परवानगी असणार नाही.

## कामाच्या ठिकाणांबाबतचे अतिरिक्त निदेश

आठ. शक्य असेल तेथवर,घरून काम करण्याची पद्धत अनुसरण्यात यावी.

नऊ. कार्यालये, कामाची ठिकाणे, दुकाने, बाजारपेठा आणि औद्योगिक व वाणिज्य आस्थापना यांमध्ये कामाचे/कामकाजाचे तास हे वेगवेगळे असावेत.

दहा. औष्णिक परीक्षण ( थर्मल स्कॅनिंग), हात स्वच्छ करण्याचे द्रव्य (हँडवॉश), निर्जंतुकीकरण द्रव्य (सॅनिटायझर) हे सर्व प्रवेशद्वाराजवळ व निर्गमन द्वाराजवळ आणि सामाईक क्षेत्रात पुरविण्यात येईल.

अकरा. संपूर्ण कामाच्या ठिकाणाचे, सामाईक सुविधांचे व मानवी संपर्कात येणा-या सर्व जागा यांचे, उदाहरणार्थ. दरवाजांच्या मुठी (डोअर हॅण्डल), इत्यादींचे कामाच्या पाळ्यांमध्ये वारंवार निर्जंतुकीकरण (सॅनि टायझेशन) करण्याची सुनिश्चिती करण्यात येईल.

बारा. कामाच्या ठिकाणाच्या सर्व प्रभारी व्यक्ती, कामगारांमध्ये पुरेसे अंतर राखून, कामाच्या पाळी दरम्यान पर्याप्त अंतर ठेवून, दुपारच्या जेवणाच्या वेळेत पुरेसे अंतर ठेवून त्याद्वारे सामाजिक अंतर राखण्याची सुनिश्चिती करतील.

जोडपत्र-तीन

[महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२, आदेश क्रमांक: डीएमयू/२०२०/प्र. क्र.९२/डीएम-१, दिनांक :१९ मे, २०२०]

कोविड-१९ लॉकडाऊन ४.०

महाराष्ट्रात कशाला मुभा आहे आणि कशाला मुभा नाही

| कार्ये | रेड झोन | उर्वरित क्षेत्र | परिरोधक (प्रतिबंधित) प्रक्षेत्र |
|---|---|---|---|
| प्रवास- विमान , रेल्वे, मेट्रो | नाही | नाही | नाही |
| आंतर-राज्य,रस्ते वाहतूक | नाही | नाही | नाही |
| शैक्षणिक संस्था | नाही | नाही | नाही |
| अतिथीगृहे- हॉटेल्स | नाही | नाही | नाही |
| भव्य बाजार संकुले (शॉपिंग मॉल्स) | नाही | नाही | नाही |
| प्रार्थना स्थळे व भव्य सभा | नाही | नाही | नाही |
| दारूची दुकाने | होय/घरपोच सेवा | होय | नाही |
| ६५ पेक्षा अधिक वयाच्या व्यक्ती व १० पेक्षा कमी वयाची बालके , गर्भवती महिला, यांचे बाहेर जाणे | नाही | नाही | नाही |
| वैद्यकीय चिकित्सालये, बाह्य रुग्ण विभाग | होय | होय | नाही |
| टॅक्सी, कॅब, रिक्षा | नाही | १+२ | नाही |
| चारचाकी वाहन | अत्यावश्यक | १+२ | नाही |
| दुचाकी वाहन | अत्यावश्यक | १ | नाही |
| आंतर-जिल्हा बस सेवा चालविणे (२) | नाही | नाही | नाही |
| जिल्ह्यांतर्गत बस सेवा चालविणे | नाही | होय | नाही |
| वस्तूंचा पुरवठा | होय | होय | होय |
| उद्योग (नागरी) | अत्यावश्यक | होय | नाही |
| उद्योग (ग्रामीण) | लागू नाही | होय | नाही |

| | | | |
|---|---|---|---|
| मूळ जागी (In situ) असलेली नागरी बांधकामे | होय | होय | नाही |
| इतर खाजगी बांधकाम जागा | नाही | होय | नाही |
| शहरी स्वतंत्र दुकाने | मर्यादित | होय | नाही |
| अत्यावश्यक वस्तूंची दुकाने | होय | होय | होय |
| ई-कॉमर्स अत्यावश्यक वस्तू | होय | होय | नाही |
| ई- कॉमर्स बिगरअत्यावश्यक वस्तू | होय | होय | नाही |
| खाजगी कार्यालये | नाही | होय | नाही |
| शासकीय कार्यालये | किमान १० च्या अधीन राहून ५% | होय १००% | नाही |
| कृषी कार्ये | नाही | होय | नाही |
| बँक व वित्तव्यवस्था | होय | होय | नाही |
| कुरिअर व टपाल सेवा | होय | होय | नाही |
| आकस्मिक वैद्यकीय सेवेसाठी वाहतूक | होय | होय | होय |
| केशकर्तनालये,स्पा, सलून | नाही | होय | नाही |
| प्रेक्षक नसलेली क्रीडांगणे | नाही | होय | नाही |
| घरपोच सेवा देणारी उपाहारगृहे ( रेस्टॉरंट्स) | होय | होय | नाही |
| दुय्यम निबंधक/ प्रादेशिक परिवहन अधिकारी/ उप प्रादेशिक परिवहन अधिकारी कार्यालये | होय | होय | नाही |

जोडपत्र-चार

[महसूल व वन, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२, आदेश क्रमांक: डीएमयू/२०२०/प्र. क्र.९२/डीएम-१, दिनांक :१९ मे, २०२०]

टाळेबंदी उपाययोजनांचे उल्लंघन केल्याबद्दल अपराध व शास्ती

अ. आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ ची कलमे ५१ ते ६०

५१. अडथळा, इत्यादी आणण्याबद्दल शिक्षा.- जो कोणी, वाजवी कारणाशिवाय,-

(क) केंद्र सरकारच्या किंवा राज्य शासनाच्या कोणत्याही अधिकाऱ्याला किंवा कर्मचाऱ्याला अथवा राष्ट्रीय प्राधिकरणाने किंवा राज्य प्राधिकरणाने किंवा जिल्हा प्राधिकरणाने प्राधिकृत केलेल्या एखाद्या व्यक्तीला या अधिनियमान्वये त्यांची कार्ये पार पाडण्यास अडथळा आणील; किंवा

(ख) केंद्र सरकार किंवा राज्य शासन किंवा राष्ट्रीय कार्यकारी समिती किंवा राज्य कार्यकारी समिती किंवा जिल्हा कार्यकारी समिती यांनी किंवा त्यांच्या वतीने, या अधिनियमान्वये दिलेल्या कोणत्याही निदेशाचे अनुपालन करण्यास नकार देईल,-

तो दोष सिद्धी झाल्यावर, एक वर्षापर्यंत वाढविता येईल इतक्या कारावासाच्या किंवा द्रव्यदंडाच्या किंवा दोन्ही शिक्षास पात्र ठरेल, आणि जर असा अडथळा आणल्यामुळे अथवा निदेशांचे अनुपालन करण्यास नकार दिल्यामुळे जीवित हानी झाली किंवा त्यामुळे जीवितास गंभीर धोका निर्माण झाला असेल तर, दोष सिद्ध झाल्यावर दोन वर्षांपर्यंत वाढविता येईल त्या कारावासाच्या शिक्षेस पात्र ठरेल.

५२. खोट्या दाव्याबद्दल शिक्षा:

जो कोणी, केंद्र सरकार ,राज्य शासन , राष्ट्रीय प्राधिकरण ,राज्य प्राधिकरण किंवा जिल्हा प्राधिकरण यांच्या कोणत्याही अधिकाऱ्याकडून आपत्तीच्या परिणामी मिळणारी कोणतीही मदत, सहाय्य करण्यात येणारी दुरूस्ती , पुनर्रचना अथवा अन्य लाभ मिळविण्यासाठी हेतुपुरस्सर असा दावा करील की, जो खोटा असल्याचे त्यास माहीत असेल वा तसे समजण्यास कारण असेल तर तो, दोष सिद्ध झाल्यावर, दोन वर्षापर्यंत वाढविता येईल इतक्या कारावासाच्या शिक्षेस आणि द्रव्यदंडास देखील पात्र ठरेल.

५३. पैशाचा किंवा साहित्य, इत्यादीचा दुर्विनियोग केल्याबद्दल शिक्षा:

कोणत्याही इशारादर्शक आपत्तीच्या परिस्थितीत अथवा आपत्तीच्या काळात सहाय्य करण्याच्या प्रयोजनार्थ असलेला कोणताही पैसा वा साहित्य ज्याच्याकडे सोपविण्यात आलेले असेल किंवा अन्यथा ज्याच्या कब्जात असेल किंवा अशा पैशावर वा साहित्यावर ज्याची सत्ता असेल असा जो कोणी, अशा पैशाचा व साहित्याचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा दुर्विनियोग करील किंवा स्वतःसाठी विनियोग करील किंवा विल्हेवाट लावील किंवा बुद्धिपुरस्सरपणे अन्य कोणत्याही व्यक्तीस तसे करण्यास भाग पाडील, तो दोष सिद्ध झाल्यावर, दोन वर्षापर्यंत वाढविता येईल इतक्या कारावासाच्या शिक्षेस आणि द्रव्यदंडास देखील पात्र ठरेल.

५४. खोटी पूर्वसूचना दिल्याबद्दल शिक्षा.-

जो कोणी, आपत्तीसंदर्भात अथवा तिच्या तीव्रतेबाबत वा परिणामाबद्दल ज्यामुळे घबराट निर्माण होईल, अशाप्रकारे खोटा धोक्याचा इशारा किंवा पूर्वसूचना देईल वा प्रसारित करील तो, दोष सिद्ध झाल्यावर, एक वर्षापर्यंत वाढविता येईल इतक्या कारावासाच्या शिक्षेस किंवा द्रव्यदंडास पात्र ठरेल.

**५५. शासकीय विभागांनी केलेले अपराध.-**

(१) जेव्हा या अधिनियमाखालील अपराध शासनाच्या कोणत्याही विभागाने केलेला असेल त्याबाबतीत अशा अपराधासाठी विभाग प्रमुख, दोषी मानण्यात येईल आणि असा अपराध, त्याच्या नकळत घडला होता किंवा असा अपराध घडू नये म्हणून त्याने सर्व प्रकारची दक्षता घेतली होती असे त्याने सिद्ध न केल्यास, त्यानुसार खटला भरण्यास व शिक्षेस तो पात्र असेल.

(२) पोटकलम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, जेव्हा या अधिनियमाखालील अपराध शासनाच्या कोणत्याही विभागाने केलेला असेल आणि असा अपराध विभाग प्रमुखाखेरीज, अन्य अधिकाऱ्याच्या संमतीने किंवा त्याने दुर्लक्ष केल्यामुळे किंवा त्याच्या कोणत्याही निष्काळजीपणामुळे घडून आला असल्याचे सिद्ध झाले असेल त्याबाबतीत, असा अधिकारी, त्याअपराधासाठी दोषी असल्याचे मानण्यात येईल आणि त्यानुसार खटला भरण्यास व शिक्षेस तो, पात्र असेल.

**५६. अधिकाऱ्याने कर्तव्यात कसूर करणे किंवा या अधिनियमाच्या तरतुदींचे उल्लंघन करणाऱ्याकडे त्याने दुर्लक्ष करणे.-**

ज्या अधिकाऱ्यावर या अधिनियमाद्वारे किंवा त्यान्वये कोणतेही कर्तव्य लादण्यात आले असेल आणि जो त्याचे पदीय कर्तव्य पार पाडणे बंद करील किंवा पार पाडण्यास नकार देईल किंवा अशा पदीय कर्तव्यापासून स्वतःला दूर ठेवेल असा कोणताही अधिकारी त्याच्या कार्यालयीन वरिष्ठांकडून सुस्पष्ट लेखी परवानगी मिळाली नसेल तर किंवा तसे करण्यास त्याला इतर कायदेशीर कारण नसेल तर तो, एक वर्षापर्यंत असू शकेल इतक्या मुदतीच्या कारावासाच्या शिक्षेस किंवा द्रव्यदंडास पात्र असेल.

**५७. अधिग्रहणाशी संबंधित असणाऱ्या कोणत्याही आदेशाचे उल्लंघन केल्याबाबत शास्ती.-**

जर कोणत्याही व्यक्तीने कलम ६५ अन्वये दिलेल्या कोणत्याही आदेशाचे उल्लंघन केले तर, ती व्यक्ती, एक वर्षापर्यंत असू शकेल इतक्या मुदतीच्या कारावासाच्या शिक्षेस किंवा द्रव्यदंडास किंवा दोन्ही शिक्षेस पात्र असेल.

**५८. कंपन्यांनी केलेला अपराध.-**

(१) जेव्हा या अधिनियमाखालील अपराध एखाद्या कंपनीने किंवा निगम निकायाने केला असेल त्याबाबतीत अपराध केला त्या वेळी, कंपनीचे कामकाज चालविण्याकरिता जी व्यक्ती, कंपनीची प्रभारी होती किंवा त्यास जबाबदार होती अशी प्रत्येक व्यक्ती, त्याचप्रमाणे, कंपनी, अशा उल्लंघणासाठी दोषी असल्याचे मानण्यात येईल आणि त्यानुसार तिच्याविरुद्ध खटला भरण्यास आणि त्यानुसार होणाऱ्या शिक्षेस ती पात्र असेल:

परंतु असे की, जर त्या व्यक्तीने, असा अपराध तिच्या नकळत घडला होता किंवा असा अपराध घडू नये म्हणून तिने योग्य ती दक्षता घेतली होती हे सिद्ध केले तर, या पोट कलमातील कोणतीही गोष्ट या अधिनियमान्वये तरतूद केलेल्या कोणत्याही शिक्षेस अशा कोणत्याही व्यक्तीस पात्र ठरविणार नाही.

(२) पोटकलम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, जेव्हा या अधिनियमाखालील अपराध, एखाद्या कंपनीने केलेला असेल, आणि असा अपराध कोणत्याही संचालकाच्या, व्यवस्थापकाच्या, सचिवाच्या किंवा कंपनीच्या अन्य कोणत्याही अधिकाऱ्याच्या संमतीने, किंवा त्याने दुर्लक्ष केल्यामुळे किंवा त्यांच्या कोणत्याही निष्काळजीपणामुळे घडून आला असल्याचे सिद्ध झाले असेल त्याबाबतीत, असा संचालक, व्यवस्थापक, सचिव किंवा अन्य अधिकारी, त्या अपराधासाठी दोषी असल्याचे मानण्यात येईल आणि त्यानुसार त्याच्याविरुद्ध खटला भरण्यास व शिक्षेस पात्र असेल.

**स्पष्टीकरण.** - या कलमाच्या प्रयोजनार्थ,--

(क)"कंपनी" याचा अर्थ, कोणतीही निगम निकाय, असा आहे आणि त्यात भागीदारी संस्थेचा किंवा अन्य व्यक्ती संघाचा समावेश होतो; आणि

(ख)भागीदारी संस्थेच्या संबंधात, "संचालक" याचा अर्थ, भागीदारी संस्थेतील एक भागीदार, असा आहे.

**५९. खटला भरण्यासाठी पूर्व मंजुरी.-**

केंद्र सरकारची किंवा राज्य शासनाची, किंवा, यथास्थिती, अशा सरकारच्या सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे याबाबतीत प्राधिकृत केलेल्या अन्य कोणत्याही अधिकाऱ्याची पूर्व मंजुरी घेतल्याखेरीज, कलम ५५ व ५६ खालील शिक्षेस पात्र असलेल्या अपराधासाठी कोणताही खटला भरण्यात येणार नाही.

**६०. अपराधांची दखल.-**

(क) राष्ट्रीय प्राधिकरणाने,राज्य प्राधिकरणाने ,केंद्र सरकारने ,राज्य शासनाने, जिल्हा प्राधिकरणाने किंवा अन्य कोणत्याही प्राधिकरणाने किंवा त्या प्राधिकरणाने किंवा यथास्थिति, सरकारने याबाबतीत प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याने; किंवा

(ख) राष्ट्रीय प्राधिकरणाकडे, राज्य प्राधिकरणाकडे, केंद्र सरकारकडे, राज्य शासनाकडे जिल्हा प्राधिकरणाकडे किंवा इतर कोणत्याही प्राधिकरणाकडे किंवा उपरोक्तप्रमाणे प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्याकडे, जिने अभिकथित अपराधाबाबत विहित रीतीने तीस दिवसांपेक्षा कमी नसेल इतक्या दिवसांची नोटीस दिली असेल आणि तक्रार करण्याचा जिचा हेतू असेल अशा कोणत्याही व्यक्तीने,

केलेल्या तक्रारी खेरीज, कोणतेही न्यायालय ,या अधिनियमाखालील अपराधांची दखल घेणार नाही.

## ब. भारतीय दंड संहिता, १८६० यामधील कलम १८८

**१८८. लोक सेवकाने रीतसर जारी केलेल्या आदेशाची अवज्ञा.-**

एखादा आदेश जारी करण्यास कायदेशीरपणे अधिकार प्रदान झालेल्या लोक सेवकाने जारी केलेल्या अशा आदेशाद्वारे, विवक्षित कृती करण्यापासून परावृत्त राहण्याचा अथवा स्वतःच्या कब्जातील किंवा स्वतःच्या व्यवस्थापनाखालील विवक्षित मालमत्तेबाबत विवक्षित बंदोबस्त करण्याचा आपणांस निदेश मिळाला आहे हे माहीत असून जो कोणी अशा आदेशाची अवज्ञा करील त्याला,_

जर कायदेशीरपणे नियुक्त झालेल्या एखाद्या व्यक्तीला अशा अवज्ञेमुळे अटकाव, त्रास किंवा क्षती झाली अथवा अटकाव, त्रास किंवा क्षती यांचा धोका उत्पन्न झाला अथवा ते होण्याकडे त्या अवज्ञेचा रोख असेल तर, एक महिन्यापर्यंत असू शकेल इतक्या मुदतीच्या साध्या कारावासाची, किंवा दोनशे रुपयांपर्यंत असू शकेल इतक्या द्रव्यदंडाची, किंवा दोन्ही शिक्षा होतील;

आणि जर अशा अवज्ञेमुळे मानवी जीवित, आरोग्य, किंवा सुरक्षितता यांना धोका पोचला किंवा पोचण्याकडे तिचा रोख असेल अथवा तीमुळे दंगा किंवा दंगल घडून आली किंवा घडून येण्याकडे तिचा रोख असेल तर, सहा महिन्यांपर्यंत असू शकेल इतक्या मुदतीच्या कोणत्यातरी एका वर्णनाच्या कारावासाची, किंवा एक हजार रुपयांपर्यंत असू शकेल इतक्या द्रव्यदंडाची, किंवा दोन्ही शिक्षा होतील.

**स्पष्टीकरण.**- अपाय घडवून आणणे अपराध्याला उद्देशित असले पाहिजे किंवा आपण अवज्ञा केल्याने अपाय घडणे संभवनीय आहे याची त्याला पूर्वकल्पना असली पाहिजे अशी आवश्यकता नाही. तो ज्याची अवज्ञा करतो त्या आदेशाची त्याला माहिती होती, आणि त्याच्या अवज्ञेमुळे अपाय घडला किंवा घडणे संभवनीय आहे, एवढे पुरेसे आहे.

उदाहरण

एका विशिष्ट रस्त्यावरून धार्मिक मिरवणूक जाता कामा नये असा आदेश जारी करण्यास कायदेशीरपणे अधिकार प्रदान झालेल्या लोक सेवकाने असा आदेश जारी केला आहे. 'क' जाणीवपूर्वक त्या आदेशाची अवज्ञा करतो, आणि त्यामुळे दंग्याचा धोका उत्पन्न होतो. 'क' ने या कलमात व्याख्या करण्यात आलेला अपराध केला आहे.

**********